**सन २०१९ ते २०२३ या वर्षासाठी राज्य शासनातर्फे देण्यात येणाऱ्या "लोकमान्य टिळक जीवन गौरव पत्रकारिता पुरस्कार", "उत्कृष्ट पत्रकारिता पुरस्कार" तसेच "अटलबिहारी वाजपेयी राष्ट्रीय पत्रकारिता पुरस्कार" या पुरस्कारांच्या वितरण सोहळयाकरीता येणाऱ्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- मावज-२०२४/प्र.क्र.७८/मावज-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २८ एप्रिल, २०२५.

वाचा :- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१४/प्र.क्र. २१३/३४, दि. १ ऑगस्ट, २०१४
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१५/प्र.क्र. ११३/३४, दि. १८ मे, २०१५
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : मावज २०१५/प्र.क्र. २२/कार्या.३४, दि. १९ डिसेंबर,२०१५
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : मावज २०१८/प्र.क्र. १६९/का.३४, दि. १२ नोव्हेंबर, २०१८
५) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : मावज- २०१६/प्र.क्र. २३८/का.३४, दि. २८ सप्टेंबर, २०१६
६) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : मावज २०१९/प्र.क्र. १९४/कार्या.३४, दि. १९ जुलै, २०१९
७) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : मावज २०२२/प्र.क्र.२००/३४, दिनांक ६ सप्टेंबर, २०२३.
८) सामान्य प्रशासन विभाग, समक्रमांक शासन निर्णय दि.०१ ऑक्टोबर, २०२४,
९) संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांचे पत्र क्र.वृत्त/२०२५/पुरस्कार २०१९-२०२३,खर्च/का-२/५१, दिनांक २१ एप्रिल, २०२५.

**प्रस्तावना :-**

शासकीय विकास योजना आणि विकासविषयक कार्यक्रमांची माहिती वृत्तपत्रे आणि वृत्तवाहिन्यांच्या माध्यमातून तळागाळातील सर्वसामान्य जनतेपर्यंत पोहचविण्याचे कार्य करणारे पत्रकार, वृत्तछायाचित्रकार, माहिती विभागाचे अधिकारी आदींना दरवर्षी शासनातर्फे पुरस्कार देण्यात येतात.

त्यानुषंगाने सन २०१९ व सन २०२३ या वर्षांतील उत्कृष्ट पत्रकारिता पुरस्कार, पत्रकारितेतील विशेष योगदानाबद्दल दिला जाणारा लोकमान्य टिळक जीवनगौरव पत्रकारिता पुरस्कार व अटलबिहारी वाजपेयी राष्ट्रीय पुरस्कार या पुरस्कार वितरण सोहळयासाठी येणाऱ्या एकूण **रुपये १,०४,५४,०००/- (रुपये एक कोटी चार लाख चौपन्न हजार फक्त )** इतक्या खर्चास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१९ ते सन २०२३ या वर्षांसाठी लोकमान्य टिळक जीवनगौरव पत्रकारिता पुरस्कार, उत्कृष्ट पत्रकारिता पुरस्कार (सन २०१९ ते २०२३) तसेच अटलबिहारी वाजपेयी राष्ट्रीय पत्रकारिता पुरस्कार या पुरस्कारांचे वितरण करण्याकरीता तसेच सदर पुरस्कार सोहळ्याच्या आयोजनासाठी येणाऱ्या रुपये १,०४,५४,०००/- (रुपये एक कोटी चार लाख चौपन्न हजार फक्त ) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.या खर्चाचा तपशील पुढील विवरणपत्रानुसार राहीलः-

| **अ.क्र.** | **बाब** | **पुरस्काराचे स्वरुप** | **एकूण रक्कम** |
|---|---|---|---|
| १. | लोकमान्य टिळक जीवनगौरव पत्रकारिता पुरस्कार सन (२०१९ ते २०२३) | रु. -/१,००,००० मानचिन्ह व प्रशस्तीपत्र | रु.५,००,०००/- |
| २. | अटलबिहारी वाजपेयी राष्ट्रीय पत्रकारिता पुरस्कार विजेत्यांना देण्यात येणारी रक्कम प्रत्येकी | रु. १,००,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र | रु.१,००,००० /- |
| ३. | अन्य पुरस्कारांची रक्कम<br>सन २०१९ एकूण १९ पुरस्कार,<br>सन २०२० एकूण १६ पुरस्कार,<br>सन २०२१ एकूण १६ पुरस्कार,<br>सन २०२२ एकूण १३ पुरस्कार,<br>सन २०२३ एकूण १०<br>असे एकूण ७४ पुरस्कार प्रत्येकी रु. ५१,०००/- प्रमाणे | रु. ५१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र | रु. ३७,७४,०००/- |
| ४. | पुरस्कार विजेत्यांना वितरण सोहळयाच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवास भत्यांसाठी देण्यात येणारी रक्कम | -- | रु. ३,००,०००/- |
| ५ | अशासकीय समिती सदस्यांना शा.नि.वित्त विभाग क्र. प्रवास १०१०/प्र.क्र.२/सेवा-५ दि. ३.०३.२०१० च्या परिच्छेद १२ मधील तरतुदीनुसार प्रवास व दैनिक भत्ता | -- | रु. ८०,०००/- |
| ६. | मानचिन्हे, प्रशस्तीपत्रे तसेच कार्यक्रमांच्या निमंत्रण पत्रिका, स्टँडी, बॅक ड्रॉप तयार करण्यासाठी अंदाजित खर्च, | -- | रु. १०,००,०००/- |
| ७ | पुरस्कार वितरण समारंभासाठी सभागृह भाडे अंदाजित खर्च , | -- | रु. ६,५०,०००/- |
| ८ | पुरस्कार वितरण समारंभाकरिता अल्पोपहार व भोजनाचा अंदाजित खर्च , | -- | रु.९,००,०००/- |
| ९ | पुरस्कार्थी व समिती सदस्य यांच्या निवास व वाहन व्यवस्थेकरिता अंदाजित खर्च | -- | रु. १२,००,०००/- |
| १० | पुरस्काराच्या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन अंदाजित खर्च | -- | रु. १,५०,०००/- |
| ११ | इतर खर्च (शाल, श्रीफळ, पुष्पगुच्छ, सभागृह सजावट इ.) | -- | रु. ८,००,०००/- |

| | | | |
|---|---|---|---|
| १२ | कार्यक्रमाची विविध माध्यमातन प्रसिध्दी, लाईव्ह स्ट्रिमिंग (समाज माध्यमांद्वारे) व इतर अनुषंगिक | -- | रु. १०,००,०००/- |
| | **एकूण अंदाजित खर्च एक कोटी चार लाख चौपन्न हजार फक्त** | | **रु. १,०४,५४,०००/-** |

२. सदर खर्च सन २०२५-२६ च्या आर्थिक वर्षातील मंजूर उपलब्ध अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रातील विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करुन भागविण्यात यावा. या वितरण सोहळ्याचा रु. १,०४,५४,०००/- इतका खर्च "सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्रमांक ए-६, प्रधान लेखाशीर्ष २२२०-माहिती व प्रसिद्धी, (००) (०१) प्रसिद्धी संचालक (अनिवार्य), १३-कार्यालयीन खर्च,२२२० ००४३ या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या वित्तीय वर्षामधील उपलब्ध अनुदानामधून भागविण्यात येईल.

३. सदर खर्चास वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५, उपविभाग ३, अ.क्र.४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार मान्यता देण्यात येत आहे.

४. या प्रकरणी आलेल्या खर्चाची देयके सन २०२५-२६ या आर्थिक वर्षातील वरील परिच्छेदात नमूद मंजूर लेखाशीर्षातील उपलब्ध अनुदानातूनच खर्ची पडतील याची काटेकोरपणे दक्षता माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने घ्यावी.

५. सदर शासन निर्णयाद्वारे संदर्भाधीन क्र.८ येथील दिनांक १.१०.२०२४ रोजीचा शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे.

६. या पुरस्कार सोहोळयासाठी उपस्थित राहणाऱ्या सर्व संबंधित पात्र पुरस्कारार्थींची निवास व प्रवास व्यवस्था माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने करावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२८१३३२३६८४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARIKA UTTAM PATIL

Digitally signed by SARIKA UTTAM PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=aa374b566d78c73e42804a2013f949268134e97ca9f7b2458c4247baf4c72175, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6401C88A0E0E14D8299DD0F14BA71419FCC6EE4670C193CBF1EB58127FA5947D, cn=SARIKA UTTAM PATIL
Date: 2025.04.28 13:34:09 +05'30'

**(सारिका उ. पाटील)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद.
८. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (गृह, विधी व न्याय विभाग) यांचे खाजगी सचिव
१०. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव.

११. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१३. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
१५. समितीचे सर्व अशासकीय सदस्य
१६. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई
१७. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), नागपूर
१८. अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई
२०. सर्व संबंधित संस्था व समिती सदस्य
२१. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. संचालक, (माहिती) (वृत्त व जनसंपर्क) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२३. संचालक, (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२४. सर्व विभागीय उपसंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई, कोकण, पुणे, कोल्हापूर, नाशिक, औरंगाबाद, लातूर, अमरावती, नागपूर
२५. सर्व जिल्हा माहिती अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय
२६. उपसंचालक, महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८ स्टेट एम्पोरियम इमारत, बाबा खडकसिंग मार्ग, नवी दिल्ली- ११०००१
२७. वरिष्ठ सहाय्यक संचालक, महाराष्ट्र परिचय केंद्र, श्री.काकुले यांची इमारत, दादा वैद्य रोड, पणजी, गोवा.
२८. भारतीय जनता पक्ष, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.कुटीर क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२०
२९. भारतीय राष्ट्रीय काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस(इं.) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०० ०२५
३०. राष्ट्रवादी काँग्रेस पक्ष, ठाकरसी हाऊस, जे.एन.हेरेडिया मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई- ३८
३१. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८.
३२. बहुजन समाज पक्ष, प्रदेश सचिव, महाराष्ट्र राज्य, बी.एस.जी.भवन, भूखंड क्र. ८३-ए, कलेक्टर कॉलनी, चेंबूर, मुंबई-४०० ०७४
३३. भारतीय कम्युनिस्ट पक्ष, महाराष्ट्र समिती, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल मार्ग,मुंबई-०४
३४. भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पक्ष, महाराष्ट्र समिती, जनशक्ती सभागृह, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-४०० ०१३
३५. महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई-४०० ०२८.
३६. निवड नस्ती (का.३४), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई